**औषध नियंत्रण पद्धतीचे बळकटीकरण या केंद्र पुरस्कृत योजनेतंर्गत अन्न व औषध प्रशासनातील विभागीय व जिल्हा कार्यालयातील औषध विभागाकरीता २६ वाहने भाडेतत्वावर उपलब्ध करुन घेण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१७/प्र.क्र.३८/औषधे-२**

गो. ते.रुग्णालय, आवार इमारत, ९ वा मजला,

लो. टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई ४०० ००१.

दिनांक : ०५ डिसेंबर, २०१८.

**वाचावे :-**

१) आयुक्त, अन्न व औषध प्रशासन, मुंबई यांचे पत्र क्र.अवऔ/वाहने भाड्याने/१३८/२०१७/३ब, दिनांक १२.०५.२०१७.

२) वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१५/प्र.क्र.१०१/औषधे-२, दिनांक १६.०६.२०१७.

३) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.शापसे-३४१८/प्र.क्र.०८/का.३१, दिनांक ०३.०४.२०१८.

४) आयुक्त, अन्न व औषध प्रशासन, मुंबई यांचे पत्र क्र.अवऔ/वाहने भाड्याने/२२६/२०१८/३ब, दिनांक २१.०५.२०१८.

**प्रस्तावना :-**

मा.मंत्रिमंडळाच्या दिनांक ०३.०१.२०१७ रोजीच्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयानुसार राज्यातील औषध नियंत्रण पद्धतीचे बळकटीकरण करणेबाबत उक्त संदर्भाधिन क्र.०२ येथे नमूद दिनांक १६.०६.२०१७ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. सदर शासन निर्णयातील तरतुदीनुसार वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, महाराष्ट्र शासन व केंद्रीय आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांच्यासमवेत दिनांक ०१.०५.२०१७ रोजी सामंजस्य करार (MOU) करण्यात आला आहे. सदर योजना ही सन २०१८-२०१९ ते सन २०१९-२०२० या कालावधीमध्ये राबविण्यात येणार आहे. सदर योजनेतंर्गत करण्यात आलेल्या सामंजस्य करारामध्ये वाहने भाडेतत्वावर घेण्यासाठी प्रतिवर्षी रु.१९४.४० लाख इतकी तरतूद केली आहे. त्यानुसार आयुक्त, अन्न व औषध प्रशासन, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी उक्त संदर्भाधिन क्र.४ येथे नमूद २१.०५.२०१८ च्या पत्रान्वये विभागीय व जिल्हा कार्यालयांसाठी तवेरा/ स्कॉर्पिओ/

सुमो/बोलेरो/झायलो/एजॉय इत्यादी जीप प्रवर्गातील २६ वाहने सामान्य प्रशासन विभागाच्या उक्त संदर्भाधिन क्र.३ येथे नमूद दिनांक ०३.०४.२०१८ च्या शासन निर्णयासमवेतच्या विवरणपत्रामधील दरानुसार खाजगी पुरवठादाराकडून भाडेतत्वावर उपलब्ध करुन घेण्यास मान्यता देणेबाबत विनंती केली आहे. त्यानुसार सन २०१८-२०१९ ते सन २०१९-२०२० या कालावधीसाठी तवेरा/ स्कॉर्पिओ/ सुमो/बोलेरो/झायलो/एजॉय इत्यादी जीप प्रवर्गातील एकुण २६ वाहने भाडेतत्वावर घेण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

औषध नियंत्रण पद्धतीचे बळकटीकरण या केंद्र पुरस्कृत योजनेतंर्गत करण्यात आलेल्या सामंजस्य करारानुसार सन २०१८-२०१९ ते सन २०१९-२०२० या कालावधीसाठी अन्न व औषध प्रशासनातील विभागीय व जिल्हा कार्यालयातील औषध विभागाकरीता एकुण २६ वाहने भाडेतत्वावर उपलब्ध करुन घेण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

सदर वाहनांचा तपशिल खालीलप्रमाणे आहे :-

| वाहनांचा तपशिल | वाहनांची संख्या | भाडोत्री वाहन पुरविण्याचे न्युनतम दर (30/31 Days 2000 K.M. (Minimum 12 Hr./Day Duty) |
|---|---|---|
| १) TAVERA<br>२) SCORPIO AC<br>३) SUMO<br>४) BOLERO<br>५) XYLO<br>६) ENJOY | २६ | रु.६२०००/- |

२. सामान्य प्रशासन विभागाच्या उक्त दिनांक ०३.०४.२०१८ च्या शासन निर्णयामध्ये नमूद अटी व शर्तीचे पालन करुन वरील २६ वाहने खाजगी पुरवठादारांकडून भाडेतत्वार उपलब्ध करुन घ्यावीत.

३. प्रस्तूत प्रकरणी येणारा खर्च सन २०१८-१९ या वित्तीय वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व तो "मागणी क्र. एस-४ ४२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यांवरील भांडवली खर्च

०४-सार्वजनिक आरोग्य १०७-सार्वजनिक आरोग्य प्रयोगशाळा (००) (०१) अन्न व औषध प्रशासन बळकटीकरण प्रयोगाशाळांची आस्थापना (केंद्र हिस्सा ६०%) दत्तमत (४२१० २६३४) ५२- यंत्रसामुग्री व साधनसामुग्री" व "मागणी क्र. एस-४ ४२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यांवरील भांडवली खर्च ०४-सार्वजनिक आरोग्य १०७- सार्वजनिक आरोग्य प्रयोगशाळा (००) (०२) अन्न व औषध प्रशासन आणि प्रयोगशाळांची आस्थापना (राज्य हिस्सा ४०%) दत्तमत (४२१० २६४३) ५२- यंत्रसामुग्री व साधनसामुग्री" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३ विनियम, भाग-२ दिनांक १७.०४.२०१५ अन्वये सुधारीत केलेल्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उप विभाग २ मधील अनुक्रमांक १३ नियम क्र.६० व ६१ अनुसार प्रशासकीय विभागाला प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२२७१५१४३४१९१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MAHAJAN
HEMANT
ANANT

Digitally signed by MAHAJAN HEMANT ANANT
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Medical Education and Drug Department, postalCode=400001, st=Maharashtra, 2.5.4.20=18b72890e049ba3219e993bae40e4fae87fba16fd8c92cbf7f96107d9c100ae1, serialNumber=4146b85aaa58555e80c9d75a2aba23b993e46df208b0b469f1b74670dc22d7fa, cn=MAHAJAN HEMANT ANANT
Date: 2018.12.27 15:19:10 +05'30'

**( हेमंत महाजन )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त, अन्न व औषध प्रशासन, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. महालेखापाल-महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४. निवासी कोषागार अधिकारी मुंबई.
५. उपसचिव (अलेप), वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. वित्त विभाग (विनियम/व्यय-१३).
७. निवड नस्ती, औषधे-२.